**पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षाकरिता १० अस्थायी पदांना व जागतिक बँक अर्थसहाय्यित जलस्वराज्य प्रकल्पांतर्गत निर्माण करण्यात आलेल्या २ अस्थायी पदांना, दिनांक ०१ मार्च, २०२० ते दिनांक ३० जून, २०२० पर्यंत मुदतवाढ देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आस्था-२०१६/प्र.क्र.१०८/पापु-०१**

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत, क्रॉफर्ड मार्केटजवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई- ०१
तारीख: १२ मार्च, २०२०

वाचा :

१) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः** आढावा-१००१/प्र.क्र.६२८/ पापु-०१, दिनांक ०४ सप्टेंबर, २००२.
२) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः** आस्था-२०११/प्र.क्र.२९७/पापु-०१, दिनांक २३ सप्टेंबर, २०१४.
३) **शासन निर्णय ,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांकः** आस्था-२०१६/प्र.क्र.१०८/ पापु-०१, दिनांक ११ ऑक्टोबर, २०१९.
४) **शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांकः** पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक १२ फेब्रुवारी, २०२०.

प्रस्तावना :

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या उक्त वाचा मधील क्रमांक १ येथील दिनांक ०४ सप्टेंबर, २००२ रोजीच्या शासन निर्णयान्वये, पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील (खुद्द) पदांबाबतच्या आढाव्यानुसार, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षाकरिता विभागाच्या आकृतीबंधात समाविष्ट असणाऱ्या १० अस्थायी पदांना व उक्त वाचा मधील क्रमांक २ येथील दिनांक २३ सप्टेंबर, २०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये, जागतिक बँक अर्थसहाय्यित जलस्वराज्य प्रकल्पांतर्गत निर्माण करण्यात

आलेल्या २ अस्थायी पदांना, उक्त वाचा मधील क्रमांक ३ येथील दिनांक ११ ऑक्टोबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये, दिनांक ०१ ऑक्टोबर, २०१९ ते दिनांक २९ फेब्रुवारी, २०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मंजूरी देण्यात आलेली आहे.

०२. उक्त वाचा मधील क्रमांक ४ येथील वित्त विभागाच्या दिनांक १२ फेब्रुवारी, २०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये, सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु त्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दिनांक ०१ मार्च, २०२० ते दिनांक ३१ ऑगस्ट, २०२० पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आलेले आहेत. त्यानुषंगाने, पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षाकतील १० अस्थायी पदांना व जागतिक बँक अर्थसहाय्यित जलस्वराज्य प्रकल्पांतर्गत निर्माण करण्यात आलेल्या २ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय:

राज्यातील जनतेला शुध्द व पुरेसे पिण्याचे पाणी पुरविण्याचा शासनाचा संकल्प असून, पाणी पुरवठा व स्वच्छता कार्यक्रमास शासनाने प्राधान्य दिलेले आहे. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागांतर्गत, सुधारणा सहाय्य व व्यवस्थापन कक्षामार्फत जागतिक बँकेच्या अर्थसहाय्याने जलस्वराज्य टप्पा-२ या कार्यक्रमाची अंमलबजावणी सुरु आहे. सदरहू काम योग्यरित्या पार पाडण्यासाठी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षाकरिता १० अस्थायी पदांची व जागतिक बँक अर्थसहाय्यित जलस्वराज्य प्रकल्पांतर्गत निर्माण करण्यात आलेल्या २ अस्थायी पदांची आवश्यकता आहे.

०२. जलस्वराज्य टप्पा-२ हा प्रकल्प मार्च, २०२० अखेर पुर्ण करावयाचा आहे. अद्याप ही राज्यातील जनतेला शुध्द व पुरेसे पिण्याचे पाणी पुरविण्याचा शासनाचा संकल्प असून पाणी पुरवठा व स्वच्छता कार्यक्रमास शासनाने प्राधान्य दिलेले आहे. राज्यातील सर्व महसूल विभागातील नागरी/ग्रामीण क्षेत्रातील वार्षिक कृती आराखडे तयार करणे, टंचाई निवारण कार्यक्रम ग्रामीण/नागरी पाणी पुरवठा, जागतिक बँक अर्थसहाय्य प्रकल्प, संत गाडगेबाबा ग्रामीण/नागरी स्वच्छता अभियान, स्वच्छ भारत मिशन (ग्रा), घनकचरा व्यवस्थापन, जल जीवन मिशन, भूजल सर्वेक्षण विकास यंत्रणेचे विविध कार्यक्रम या विभागामार्फत राबविण्यात येत असून बरीच कामे अद्याप पुर्ण झालेली नाहीत.

०३. बाह्य अर्थसहाय्यित पाणी पुरवठा व स्वच्छता कार्यक्रमाच अंमलबजावसणीसाठी सचिव (व्यय), वित्त विभाग यांच्या अध्यक्षतेखाली गठीत शक्ती प्रदान समितीची ६० वी बैठक संपन्न झाली. या बैठकीच्या इतिवृत्तातील मुद्दा क्रमांक ५ नुसार जलस्वराज्य टप्पा-२ अंतर्गत कार्यक्रमाला जून, २०२०

अखेर मुदतवाढ दिलेली आहे. तसेय या प्रकल्पास केंद्र शासनाकडून मुदतवाढ मिळविण्यासाठी देखील प्रयत्न सुरू आहेत.

०४. यास्तव, उपरोक्त वाचा मधील क्रमांक ४ येथील वित्त विभागाच्या दिनांक १२ फेब्रुवारी, २०२० च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार, या शासन निर्णयासोबत जोडलेल्या प्रपत्र-अ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षाकरिता १० अस्थायी पदांना व प्रपत्र-ब मध्ये दर्शविण्यात आलेल्या जागतिक बँक अर्थसहाय्यित जलस्वराज्य प्रकल्पांतर्गत निर्माण करण्यात आलेल्या २ अस्थायी पदांना, दिनांक ०१ मार्च, २०२० ते दिनांक ३० जून, २०२० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

०५. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या (खुद्द) आस्थापनेवरील सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षाकरिता १० अस्थायी पदांवर होणारा खर्च, मागणी क्रमांक वाय-५, लेखाशीर्ष-३४५१-सेक्रेटरीएट आर्थिक सेवा-०९०-सेक्रेटरीएट (१) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (३४५१ ०४६७) या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२०२० या वित्तीय वर्षाच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा. तसेच जागतिक बँक अर्थसहाय्यित जलस्वराज्य प्रकल्पांतर्गत निर्माण करण्यात आलेल्या २ अस्थायी पदांच्या वेतन व भत्त्यावरील खर्च हा जलस्वराज्य कार्यक्रमासाठी भारतीय स्टेट बँक, बेलापूर, बेलापूर शाखा, नवी मुंबई येथील खाते क्रमांक ३१८६८४३४७८१ मधून कार्यक्रम कालावधीपुरता करण्यात यावा.

०६. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या दिनांक १२ फेब्रुवारी, २०२० च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार, प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१२१०५१०२३६२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deshmukh Varsha Gunvant

Digitally signed by Deshmukh Varsha Gunvant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=318374474bdbbee0a87fa98c6ce4addbc6f40c52596bc652c9c91f0a77a35550, serialNumber=b030780a012e3648cb356030f4d4bfd6dcfed5e1526059a46c087a14fe3c29a0, cn=Deshmukh Varsha Gunvant
Date: 2020.03.12 11:27:29 +05'30'

**(वर्षा देशमुख)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.

२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
४. उप सचिव, वित्त विभाग (आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई.
५. उप सचिव तथा प्रकल्प संचालक (पापु-११), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रकल्प व्यवस्थापक, सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
७. अवर सचिव (रोखशाखा), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अवर सचिव (पापु-११), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. अवर सचिव/कार्यासन अधिकारी (पापु-०४), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती (कार्यासन पापु-०१).

## प्रपत्र- अ

शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आस्था-२०१६/प्र.क्र.१०८/पापु-०१,
दिनांक १२ मार्च, २०२० सोबतचे सहपत्र.
सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्षाच्या (तत्कालीन प्रकल्प नियोजन व नियंत्रण कक्ष) अंतर्गत
अस्थायी पदे

| अ. क्र. | पदनाम | नवीन पदनाम | वेतन बँड + ग्रेड पे (६ वा वेतन आयोग | पदसंख्या |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | उप सचिव व संचालक (प्रकल्प व्यवस्थापन कक्ष) | उप सचिव तथा प्रकल्प संचालक (सुधारणा सहाय्य व प्रकल्प व्यवस्थापन कक्ष) | ७ वा वेतन आयोग- मॅट्रीक-४ लेव्हल-११ | १ |
| २ | प्रकल्प अधिकारी | प्रकल्प व्यवस्थापक | रु. १५६००-३९१०० + रु.६६०० | १ |
| ३ | उप अभियंता | तांत्रिक अधिकारी | रु. १५६००-३९१०० + रु.५४०० | १ |
| ४ | उप लेखापाल | उप लेखापाल | रु. ९३००-३४८०० + रु.४२०० | १ |
| ५ | उच्चश्रेणी लघुलेखक | उच्चश्रेणी लघुलेखक | रु. ९३००-३४८०० + रु.४४०० | १ |
| ६ | लिपिक-टंकलेखक | लिपिक-टंकलेखक | रु. ५२००-२०२०० + रु.१९०० | १ |
| ७ | वाहनचालक नि सर्वसाधारण सहायक | वाहनचालक नि सर्वसाधारण सहायक | रु. ५२००-२०२०० + रु.१९०० | २ |
| ८ | शिपाई | शिपाई | रु. ४४४०-७४४० + रु.१३०० | २ |
| | **एकूण** | | | **१०** |

Deshmukh Varsha Gunvant

Digitally signed by Deshmukh Varsha Gunvant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400001, st=Maharashtra, 2.5.4.20=318374474bdbbee0a87fa98c6ce4addbc6f40c52596bc652c9c91f0a77a35550, serialNumber=b030780a012e3648cb356030f4d4bfd6dcfed5e1526059a46c087a14fe3c29a0, cn=Deshmukh Varsha Gunvant
Date: 2020.03.12 11:28:12 +05'30'

**(वर्षा देशमुख)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

## प्रपत्र- ब

शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक आस्था-२०१६/प्र.क्र.१०८/पापु-०१,
दिनांक १२ मार्च, २०२० सोबतचे सहपत्र.

जागतिक बँक अर्थसहाय्यित जलस्वराज्य प्रकल्पांतर्गत अस्थायी पदे

| अ. क्र. | पदनाम | वेतन बँड + ग्रेड पे (६ वा वेतन आयोग | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | अवर सचिव | रु. १५६००-३९१०० + रु.६६०० | १ |
| २ | सहायक कक्ष अधिकारी | रु. ९३००-३४८०० + रु.४३०० | १ |
| एकूण पदे | | | २ |

Deshmukh Varsha Gunvant

Digitally signed by Deshmukh Varsha Gunvant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400001, st=Maharashtra,
2.5.4.20=318374474bdbbee0a87fa98c6ce4addbc6f40c52596bc652c9c91f0a77a35550, serialNumber=b030780a012e3648cb356030f4d4bfd6dcfed5e1526059a46c087a14fe3c29a0,
cn=Deshmukh Varsha Gunvant
Date: 2020.03.12 11:28:46 +05'30'

**वर्षा देशमुख**
**अवर सचिव महाराष्ट्र शासन**